2010100615104001

**पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका**
महानगरपालिका हद्दीतील विशेष आर्थिक क्षेत्र धोरणातंर्गत सेझ प्रकल्पांना जकात करातून सूट/ माफी देण्यासाठी जकात नियमांत तरतूद करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: पीसीसी ३००९/१७९९/प्र.क्र. ४६७ /नवि-२२
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२, दिनांक: - ४ ऑक्टोबर, २०१०

वाचा :- १) मे. सिंटेल इंटरनॅशनल प्रा.लि. यांचे पत्र क्र. सीआयपीएल/सेझ/ ॲडमिनि / २००८, दि. १६ जानेवारी, २००८
२) या विभागाचे समक्रमांकाचे दि १८ जानेवारी, २००८ चे पत्र
३) आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी यांचे पत्र क्र. जकात/ १० / कावि/८१/२००८, दि. २६.३.२००८ चे पत्र
४) आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी यांचे पत्र क्र. जकात/१०/कावि/४३६/ २००९ व महासभा ठराव क्र. ७२२ दि. २१.८.२००९ आणि ठराव क्र.५४० दि.२६.१२.०८
५) उदयोग, उर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.एसईझेड-२००१/(१५२) उदयोग-२ दि.१२.१०.२००१

**प्रस्तावना:-**

आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, यांनी विशेष आर्थिक क्षेत्र धोरणातंर्गत उद्योगांना प्रोत्साहन मिळण्यासाठी उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या सेझ प्रकल्पाबाबत दि. १२.१०.२००१ च्या शासन निर्णयानुसार सेझ प्रकल्पांना जकात करातून सूट देण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. १२.१०.२००१ च्या शासन निर्णयान्वये सेझ प्रकल्पांतर्गत राज्यात मोठ्या प्रकल्पांची गुंतवणूक आकर्षित करण्यासाठीचे धोरण जाहीर केलेले आहे. या शासन निर्णयातील परि. ६ नुसार महानगरपालिकेने अशा सेझ प्रकल्पांना चालना देण्यासाठी जकात करातून सुट देणे आवश्यक आहे अशी तरतूद आहे. त्यानुसार महापालिका ठराव क्र. ५४० दि.२२.१२.२००८ नुसार नागरीकांच्या हरकती व सुचना मागविल्या परंतु प्रस्तुत प्रकरणी एकही हरकत प्राप्त झाली नसल्याने आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांनी सेझ ॲक्ट अंतर्गत आय.टी. कंपन्यांनी बांधकामासाठी महानगरपालिका हद्दीत आयात केलेल्या मालावर जकात माफीची तरतूद करण्यासाठी जकात नियम २००१ मधील नियम ४ अनुसूची (दोन) मध्ये मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम १२७,१४९(५) (२) आणि कलम ४५५ अन्वये माफीची तरतूद करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णयः-

आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी यांनी सदर प्रस्तावासंदर्भात, सादर केलेला तपशिल, महापालिका ठराव क्र. ५४० दि. २२.१२.२००८ तसेच महासभा ठराव क्र.७२२ दि.२१.०८.२००९ आणि शासनाचे सेझ प्रकल्पाबाबतचे धोरण विचारात घेता, पिंपरी चिंचवड महानगरपालिका जकात नियम २००१ मधील, नियम ४ अनुसूची (दोन) मध्ये अ.क्र. २९ येथे "पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका क्षेत्रातील सेझ विकासक आणि सेझ मधील आय.टी.युनिटसला विकास आयुक्त सिप्झ सेझ यानी मंजूर केलेल्या यादीतील मालास आदेशाच्या तारखेपासून ३० दिवसांनतर ५ वर्षासाठी सूट/माफी राहील, तथापी, अशी सूट/माफी घेतांना प्रथम संबंधितांनी जकातीचा भरणा महानगरपालिकेस करणे आवश्यक आहे. तदनंतर, त्यांनी सेझ मधील आयटी उद्योगविषयक कागदपत्रांची पूर्तता महानगरपालिकेकडे करुन परतावा मागणी करणे आवश्यक आहे " अशी तरतूद करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम १२७, १४९, ४५४ व कलम ४५५ अन्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०२. पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका जकात नियम -२००१ मधील उपरोक्त दुरुस्ती आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी यांनी तात्काळ शासन राजपत्रात प्रसिद्ध करावी.

०३. सदर आदेश आदेशाच्या तारखेपासून ३० दिवसांनतर अंमलात येतील

०४. या आदेशानुषंगीक सर्व बांबीची पूर्तता आयुक्त, पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका यांनी करावी, तसेच या आदेशाचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( आ.श्रा.जिवने)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१.मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा.राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. सचिव (नवि-२), यांचे स्विय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. आयुक्त,पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी,पुणे .
६. उपायुक्त (जकात), पिंपरी चिंचवड शहर महानगरपालिका, पिंपरी, पुणे
७. कक्षअधिकारी (संगणक शाखा), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. निवडनस्ती (नवि-२२)

**********

D:\PIMPARI CHINCHAWAD\OCTRAI\G.R. ez project syntel.doc